देयकांसोबत खर्च मंजूरी आदेश तसेच अनुदान वितरण आदेशाच्या शाईच्यास्वाक्षरीची प्रत जोडण्याबाबत सविस्तर सूचना

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

**शासन परिपत्रक क्र.- संकीर्ण -२०२२/प्र.क्र.२५/२०२२/कोषा प्रशा-५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १६ मार्च, २०२२.

वाचा : शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०२१ / प्र.क्र. १८/ २१/ कोषा प्रशा ५, दि. २२ फेब्रुवारी, २०२१

प्रस्तावना :-

मुंबई वित्तीय नियम, १९५९ च्या नियम १५२(A) (a) मधील तरतूदीन्वये केवळ खर्चास मंजूरी देण्याबाबतचे शासन निर्णय , ज्ञापन , पत्र , आदेश इ. शाईच्या सहीने निर्गमित करणे आवश्यक आहे. सदर तरतूदीन्वये अनुदान वितरण / निधी वाटप आदेश शाईच्या सहीने निर्गमित करण्याबाबत कोणताही उल्लेख केलेला नाही. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण १००६/प्र.क्र.१३१/कोषा प्रशासन ५ , दि. १५ मे ,२००७ अन्वये अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे (बीम्स) अर्थसंकल्पीय तरतूदींचे वाटप केल्यास शाईच्या स्वाक्षरीचे अनुदान वाटप आदेश निर्गमित करण्याची आवश्यकता राहणार नाही असे स्पष्ट करण्यात आलेले आहे. तथापि, महाराष्ट्र कोषागार नियम नमुना क्र. ४४ मध्ये सादर होणाऱ्या सहायक अनुदान देयकांच्या बाबतीत मात्र अनुदान वितरण / निधी वाटप आदेशाच्या शाईच्या स्वाक्षरीची प्रत देयकासोबत जोडण्याची कार्यपध्दती आजतागायत सुरु आहे. याबाबत स्वयंस्पष्ट सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन परिपत्रक

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४६/कोषा प्रशा-४ दि.१०.११.२०२० नुसार महाराष्ट्र कोषागार नियम नमुना क्र. ४४ नुसार सादर होणारे सहायक अनुदानाचे देयक हे बिल पोर्टल आज्ञावलीमार्फत सादर करणे बंधनकारक आहे. “बील पोर्टलवर” महाराष्ट्र कोषागार नियम नमुना क्र. ४४ मध्ये देयक तयार करण्यासाठी पूर्व अट म्हणून “बीम्स” प्रणालीवर प्रथम निधी वितरण/वाटप आदेशाची शाईच्या स्वाक्षरीची प्रत “स्कॅन” करुन “अपलोड” करणे अनिवार्य करण्यात आले आहे. त्याशिवाय “बीम्स” प्रणालीवर सहायक अनुदानासाठीचे अनुदान /निधी वाटप करता येत नाही. “बीम्स” प्रणालीवर “अपलोड” करण्यात आलेले सदर आदेश कोषागार अधिकारी यांच्या “लॉग इन” मध्ये उपलब्ध आहेत. या पार्श्वभूमीवर महाराष्ट्र कोषागार नियम, नमुना ४४ मध्ये सादर होणाऱ्या सहायक अनुदानाच्या देयकांसोबत अनुदान वितरण/ निधी वाटप आदेशाची शाईच्या स्वाक्षरीची प्रत अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई आणि कोषागार /उपकोषागार कार्यालय यांना उपलब्ध करुन देण्याची आवश्यकता नाही.

मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील नियम १५२ (A) (a) अन्वये शाईच्या सहीची प्रत अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई आणि कोषागार / उपकोषागार कार्यालयांना उपलब्ध करुन देण्याच्या अनिवार्यतेबाबत खालीलप्रमाणे स्पष्टता करण्यात येत आहे.

महालेखापाल कार्यालय, वित्त विभाग, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई आणि कोषागार/उपकोषागार कार्यालये यांना पृष्ठांकित करावयाचे खालील प्रकारचे संलेख शाईच्या स्वाक्षरीने निर्गमित करणे अनिवार्य आहे.

१. खर्चास मंजूरी देण्याबाबतचे शासन निर्णय/ज्ञापने/पत्र/आदेश इ.

२. प्रशासकीय मान्यता/वित्तीय मान्यता देण्याबाबतचे शासन निर्णय/ज्ञापने/पत्र/आदेश.

३. सहायक अनुदान (Grant in Aid) मंजूर करणेबाबतचे शासन निर्णय /ज्ञापने /पत्र/आदेश.

३. सहायक अनुदानाच्या देयकाबाबतीत अनुदान वितरण / निधी वाटपाचे शाईच्या स्वाक्षरीचे “बीम्स” प्रणालीवर “अपलोड” केलेले आदेश (स्कॅन कॉपी) कोषागार अधिकारी यांच्या “लॉग इन” मध्ये तपासणीसाठी उपलब्ध असल्यामुळे यापुढे महाराष्ट्र कोषागार नियम नमुना क्र. ४४ मधील सहायक अनुदान देयकांसोबत **अनुदान वितरण / निधी वाटप यासंबंधी** आदेश / ज्ञापन / पत्र / शासन निर्णय इत्यादीच्या शाईच्या स्वाक्षरीची प्रत देयकासोबत जोडण्याची आवश्यकता नाही. मात्र **खर्चास मंजूरी** देण्याबाबतचे शासन निर्णय / ज्ञापने / पत्र /आदेश इ. च्या शाईच्या प्रती, आहरण व संवितरण अधिकारी यांनी देयकासोबत जोडणे अनिवार्य आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून,त्याचा संकेतांक २०२२०३१६१५०४४६४६०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6015944fe7d58a83f4a54c43147b5da1e34861e2984e9f793b66f7249aaa9c1a, pseudonym=CAD826A943AA15444490C64B66C7EE464C4AD05A, serialNumber=D4994742192306FCC1DEA9AADD3810639506519FA652B919767B98B04E905A18, cn=INDRAJEET SAMBHAJI GORE
Date: 2022.03.16 15:09:43 +05'30'

**( इंद्रजित गोरे )**
**शासनाचे उपसचिव**

**प्रत,**

१.मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२.सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य,
३.मा.राज्यपाल यांचे सचिव
४.मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
५.मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
५.सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६.सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
७.मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
८.प्रबंधक, मुळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
९.प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
१०.प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
११.महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३.आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१४.आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर ४४४००१
१५.प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१६.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई

१७.सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१८.प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१९.प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२०. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१.विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२२.सर्व विभागीय आयुक्त
२३.सर्व जिल्हाधिकारी
२४.सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२५.संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई
२६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२७.सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/नाशिक /औरंगाबाद/ अमरावती /नागपूर
२८.संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण भवन, नवी मुंबई
२९.सहसंचालक,स्थानिक निधी लेखापरीक्षा मुंबई /पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती /नागपूर
३०.वित्त विभागातील सर्व कार्यासने
३१.निवड नस्ती कोषा प्र.५